**वितरण आदेश क्रमांक-३**
**२०१०-२०११**

स्वर्णजयंती ग्राम स्वरोजगार योजनेसाठी
जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणांना अनुदान.
**विशेष घटक योजनेखाली अनुसुचित जातींच्या लाभार्थ्यांना अर्थसहाय्य२०१०-११**

महाराष्ट्र शासन
ग्राम विकास व जलसंधारण विभाग
शासन निर्णय क्रं.स्वग्रायो-२०११/प्र.क्र.१३ /योजना-३,
मंत्रालय,मुंबई ४०० ०३२,
दिनांक- २३ फेब्रुवारी, २०११

वाचा:- (१) शासन निर्णय ग्राम विकास व जलसंधारण विभाग, क्र.स्वग्रायो-२००९/प्र.क्र.११४ /योजना-३, दिनांक- १० ऑगस्ट , २०१०, (वितरण आदेश क्रमांक- १)
(२) शासन निर्णय ग्राम विकास व जलसंधारण विभाग, क्र.स्वग्रायो-२०१०/प्र.क्र.२६९ /योजना-३, दिनांक- १४ डिसेंबर, २०१०, (वितरण आदेश क्रमांक- २)

**शासन निर्णय-**

केंद्र शासनाने सन १९९९-२००० पासून ७५ % पुरस्कृत स्वर्णजयंती ग्राम स्वरोजगार योजना सुरु केली आहे. या योजनेच्या अमंलबजावणीसाठी केंद्र शासनाने त्यांच्या क्र. J- १२०२५/ १/२०१० - SGSY-१ (१२), दि. ४ मे, २०१० व क्र. J- १२०२५/ १/२०१० - SGSY-१ (४१), दि. १८ जून, २०१० च्या आदेशान्वये राज्यातील जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणांना सन २०१०-११ या आर्थिक वर्षासाठी पहिला हप्ता एकूण रु. ५,६२३.२१ लाख व रू.३७४८.८७ लाख असा एकूण रू. ९३७२.०८ लाख इतका निधी वितरीत केला.

२. त्यानुसार स्वर्ण जयंती ग्राम स्वरोजगार योजनेसाठी उपरोक्त वितरण आदेश क्र. १ अन्वये रू. ८५८.७३ लाख (आठ कोटी अठठावन्न लाख त्र्याहात्तर हजार फक्त) आणि उपरोक्त वितरण आदेश क्र.२ अन्वये रु.२८१.९०लाख (रु.दोन कोटी एक्याऐंशी लाख नव्वद हजार फक्त) असा एकूण रु.११४०.६३ लाख (रु.अकरा कोटी चाळीस लाख त्रेसष्ट हजार फक्त) निधी SCP क्षेत्रातून वितरीत करण्यात आला आहे.

३. आता राज्यातील एकूण २३ जिल्ह्यांना केंद्र शासनाने दुसरा हप्ता म्हणून रु.६०७२.८६ लाख इतका निधी वितरित केला आहे. त्यानुसार जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणेकडे उपलब्ध असलेल्या निधीच्या अधीन राहून खालील विवरणात दर्शविल्या प्रमाणे सन २०१०-११ साठीचा राज्य हिस्सा **विशेष घटक योजनेखालील लाभार्थ्यांना अर्थसहाय्य रु. २१५.३९ लाख (रु. दोन कोटी पंधरा लाख एकोणचाळीस हजार फक्त)** इतके अनुदान **दि. २३ फेब्रुवारी, २०११ रोजी अर्थसंकल्पीय वितरण प्रणाली (B.D.S) द्वारे** जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणांना वितरीत करण्यात आले आहेत.

| अ.क्र. | जिल्हा | रुपये लाखात | अ.क्र. | जिल्हा | रुपये लाखात |
|---|---|---|---|---|---|
| १ | रायगड | १.२३ | ७ | औरंगाबाद | ३१.२४ |
| २ | अहमदनगर | ३७.१६ | ८ | हिंगोली | २५.५३ |
| ३ | पुणे | ४३.५८ | ९ | उस्मानाबाद | २३.७४ |
| ४ | सांगली | १५.०४ | १० | लातूर | १३.७३ |
| ५ | सोलापूर | ५.०४ | ११ | अकोला | १.८८ |
| ६ | कोल्हापूर | ११.३२ | १२ | चंद्रपूर | ५.९ |

४ सदर रकमा संबधीत मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद यांच्याकडे आहरण व संवितरण अधिकारी म्हणून सुपूर्द करण्यात येत आहेत. सदर रकमा संबंधित जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणाना अदा करण्याचे अधिकार मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद यांना प्रदान करण्यात येत आहेत. त्यांनी संबंधीत जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणेस सदर निधी प्रदान करण्याची कार्यवाही करावी.

५.	सदर खर्च ग्राम विकास व जलसंधारण विभाग मागणी क्रमांक एल-३ "२५०१- ग्रामीण विकासासाठी विशेष कार्यक्रम **, ०६, स्वयंरोजगार कार्यक्रम - १०१, स्वर्णजयंती ग्राम स्वयंरोजगार (०१) (०२ ) विशेष घटक योजनेखाली अनुसूचित जातींना अर्थसहाय्य- (२५०१ ०५५७) ३३, अर्थसहाय्य** " या उपलेखाशिर्षाखाली सन २०१०-२०११ मध्ये केलेल्या तरतूदी मधून भागवावा.

६.	हे अनुदान ज्या प्रयोजनाकरीता मंजूर करण्यात आलेले आहे, त्याच प्रयोजनाकरीता खर्च करण्यात यावे.अन्यथा ती वित्तीय अनियमितता समजण्यात येईल याची अमंलबजावणी करणा-या अधिका-यांनी नोंद घ्यावी.

७.	या शासन निर्णयान्वये मंजूर केलेले अनुदान कोषागारातून काढल्यानंतर प्रकल्प संचालकानी पुढील माहिती त्वरीत लेखाधिकारी कार्यासन क्रमांक योजना-२, ग्राम विकास व जलसंधारण विभाग यांचे कडे पाठवावी :- १) मंजूर केलेली रक्कम २) कोषागारातून काढलेली रक्कम ३) रक्कम काढल्याचा प्रमाणक क्रमांक व दिनांक .

**८.	ज्या जिल्ह्यांना समरुप हिस्सा प्राप्त होऊ शकला नाही अशा जिल्ह्यांनी सर्वसाधारण, टीएसपी व ओटीएसपी क्षेत्रातून संबंधित जिल्हाधिकारी यांचेकडून निधी प्राप्त करुन घ्यावा. यामध्ये समरुप हिस्सा कमी होणार नाही, याची दक्षता घ्यावी.**

**९.	वरील प्रमाणे निधी वितरीत करण्यात आला असला तरी मंजूर अनुदानाच्या मर्यादेत व केंद्र शासनाच्या निधीच्या समरुप हिश्याच्या मर्यादेत निधी काढण्यात यावा. कोणत्याही परिस्थितीत, मंजूर अनुदानापेक्षा जास्त व केंद्र शासनाच्या निधीच्या समरुप २५% हिश्यापेक्षा जास्त निधी आहरित होणार नाही याची दक्षता घ्यावी.**

१०.	सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www. maharashtra.gov.in वेबसाईटवर उपलब्ध असून त्याचा संगणक सांकेतांक क्रमांक २०११०२२३१६००२९००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

( रा. शं. नागरे )
अवर सचिव, महाराष्ट्र शासन.

प्रत,

१. महालेखापाल, (लेखा परिक्षा) व (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१, मुंबई (पांच जादा प्रतींसह)
२. महालेखापाल, (लेखा परिक्षा) व (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-२,नागपूर ( पांच जादा प्रतींसह)
३. विभागीय आयुक्त व त्यांच्या कार्यालयातील उपायुक्त (विकास शाखा), (सर्व) विभाग, ( दोन जादा प्रतींसह)
४. जिल्हाधिकारी, सर्व.
यांना विनंती करण्यात येते की, जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा यांनी मागितल्याप्रमाणे या योजनेसाठी निधी उपलब्ध करुन द्यावा, जेणेकरुन समरुप हिस्सा कमी पडणार नाही व केंद्र शासनाकडील पुढील निधीत कपात होणार नाही.
५. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद , सर्व.
६. प्रकल्प संचालक, जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा , सर्व.
७. जिल्हा कोषागार अधिकारी, रायगड/अहमदनगर/पुणे/सांगली/सोलापूर/कोल्हापूर/औरंगाबाद/हिंगोली /उस्मानाबाद / लातूर/अकोला/चंद्रपूर
८. नियोजन विभाग ( का. १४४१) मंत्रालय मुंबई-३२.
९. वित्त विभाग (व्यय-१५) व ( अर्थ-१६) मंत्रालय मुंबई-३२.
१०. अप्पर संचालक, प्रकल्प आखणी व एकात्मीक ग्रामीण विकास कार्यक्रम कक्ष ( पांच प्रतींसह)
११ कार्यासन अधिकारी, कार्यासन वित्त-७, वित्त-१, योजना-१, योजना-२, योजना-५ व योजना-७ ग्राम विकास व जलसंधारण विभाग.
१२. निवड नस्ती कार्यासन योजना -३, ग्राम विकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई.